केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतुदीतून केंद्र हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G६१८ अंतर्गत रु.३१०.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G६२७ अंतर्गत रु. २०६.६७ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-३५२१/प्र.क्र.४७/२१/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,

नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : ११ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१.

३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ कें.रा.हि/९०९४४-५१/२०२१-२२, दिनांक ०३.१२.२०२१.

४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.१४/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ०४.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. आरोग्यावर परिणाम करणाऱ्या महत्वाच्या घटकांचा (उदा. आहार, परिसर, स्वच्छता, सुरक्षित पाणी पुरवठा, महिला व बालविकास इ.) या अभियानामध्ये एकत्रितपणे विचार करण्यात आलेला आहे. सन २०१३-१४ या वर्षापासून केंद्र शासनाने उपरोक्त आरोग्य विषयक कार्यक्रम शहरी भागात सुध्दा राबविण्याचा निर्णय घेतला असून शहरी भागात हा कार्यक्रम "राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान" या नावाने राबविण्यात येत आहे. सदर अभियानाकरिता केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा यांचे प्रमाण ६०: ४० असे आहे. राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानाकरीता सामाजिक विशेष घटकासाठी (SCSP) निधी सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून केंद्र व राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| अ .क्र. | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय तरतूद (६०% केंद्र हिस्सा) | वितरीत केंद्र हिस्सा | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय + पुरक मागणीद्वारे तरतूद (४०% राज्य हिस्सा) | वितरीत राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|
| A | शा१३२ बीयुडी.क्र.नि.१/प्र.क्र.२१ / आ-७ दि. ०३.०८.२०२१ | १८००.०० | ८७६.०० | २३७१.७३ | ११७०.८१ |
| B | एकूण वितरीत अनुदान -: | | ८७६.०० | | ११७०.८१ |
| C | वितरणासाठी उपलब्ध तरतूद | | ९२४.०० | | १२००.९२ |

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय नागरी आरोग्य कार्यक्रमाकरीता सामाजिक विशेष घटकाकरिता (SCSP) ६०% केंद्र व ४०% राज्य हिस्सा वितरीत करण्यास सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व वित्त विभागाने मंजूरी प्रदान केली आहे. सदरचा केंद्र व राज्य हिस्सा वितरीत करण्याकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूद केंद्र हिस्सा लेखाशिर्ष २२१०G६१८ खाली रु. १८००.०० लक्ष व राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१०G६२७ करीता रु. २३७१.७३ लक्ष एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदीतून उपरोक्त प्रमाणे केंद्र हिश्श्याचे रु.८७६.०० लक्ष व राज्य् हिश्श्याचे रु.११७०.८१ लक्ष वितरीत करण्यात आले असून सदयस्थितीत केंद्र हिश्श्यापोटी रु.९२४.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रु.१२००.९२ लक्ष तरतूद शिल्लक आहे. सबब, सदर तरतुदीतून ६०% केंद्र हिश्श्यापोटी रू. ३१०.०० लक्ष व ४०% राज्य हिश्श्यापोटी रु.२०६.६७ लक्ष इतकी रक्कम राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय तरतूद | मागणी रक्कम (६०% केंद्र हिस्सा / ४०% राज्य हिस्सा) |
|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. एन-३, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०७) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान<br>(केंद्र हिस्सा ६० %) (कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१०G६१८) | १८००.०० | ३१०.०० |
| २ | मागणी क्र. एन-३, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना,<br>०१- अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०८) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान<br>(राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१०G६२७) | २३७१.७३ | २०६.६७ |

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य

आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

५. सदरचे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/ प्र.क्र.८५/ २०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक. ८८/व्यय-१४, दिनांक १७.०२.२०२२ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग अनौ.सं.क्र. ५८/SJSA, दिनांक २४.०२.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र.२०२२०२२३१९५६०३३६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE
VIJAYKUMAR
LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.11 14:46:28 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग(अर्थसंकल्प/विघयो), मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१३. निवडनस्ती (आरोग्य-७) .